अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी-गट 'ब' (राजपत्रित) या संवर्गातील पदावर पदोन्नतीने नियुक्ती

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्र. : पदोनि-१२१४/प्र.क्र.१३९/का-१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ०३ ऑक्टोबर, २०१५.

**शासन आदेश**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन सहायक-गट 'ब'(अराजपत्रित) संवर्गातील खालील कर्मचाऱ्यांना संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी-गट 'ब' (राजपत्रित) (वेतनसंरचना, वेतन बॅड ₹९,३००-३४८०० + ग्रेड वेतन ₹४,४००) या पदावर खालील परिच्छेद-२ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून त्यांच्या नावासमोर स्तंभ ६ मध्ये दर्शविलेल्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ११ महिन्यांसाठी केवळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | संशोधन सहायकाचे नांव व विद्यमान पदस्थापना | प्रवर्ग | बंधपत्रानुसार मागितलेला विभागीय संवर्ग | वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| १ | (३) | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | श्री.न. शि. खोब्रागडे, जिल्हा नियोजन समिती, गोंदिया | अजा | नागपूर | नागपूर | नियोजन अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर |

२. सदर तात्पुरती पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

i) सदर आदेशानुसार पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे व त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास तसे लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

ii) पदस्थापनेत बदल करण्याकरिता कोणत्याही स्वरुपात राजकीय दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास ही बाब गंभीर ठरवून शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

iii) पदोन्नती आदेश प्राप्त झाल्यानंतर जे संशोधन सहायक पदोन्नती स्वीकारणार नाहीत किंवा विविध सबबीखाली पदस्थापना स्वीकारण्यास टाळाटाळ करतील त्यांना आश्वासित प्रगती योजनेंतर्गत देण्यात आलेले लाभ काढून घेण्यात येतील.

iv) पदोन्नतीनंतर संबंधित संशोधन सहायक पदोन्नतीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांना पदोन्नतीबाबत स्वारस्य नसल्याचे समजून सामान्य प्रशासन विभागाच्या स्थायी आदेशानुसार निवडसूचीतून त्यांचे नांव वगळण्यात येईल. तद्नंतर कोणत्याही परिस्थितीत त्यांची विनंती मान्य करता येणार नाही.

v) संबंधित कार्यालय प्रमुखांनी संबंधित संशोधन सहायकांच्या पदाचा पदभार अन्य कर्मचाऱ्यांकडे सोपवून त्या संशोधन सहायकांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे व ज्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे त्या पदावर त्यांना संबंधित कार्यालय प्रमुखांनी रुजू करुन घ्यावे. एखाद्या कार्यालयाने रुजू करुन घेण्यास टाळाटाळ केल्यास व सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी नियमित करण्याचा प्रश्न उद्भवल्यास, कोणत्याही परिस्थितीत सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी नियमित करता येणार नाही. यासंदर्भात वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दि.२.०६.२००३ मधील परिशिष्ट-१, नियम क्र.९ (१४) (एफ) शेरा क्र.२ नुसार सक्तीचा प्रतीक्षा कालावधी निर्माण होण्यास जबाबदार ठरणा-या संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

vi) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे उपरोक्त कर्मचारी पदोन्नतीच्या पदावरील नियमित पदोन्नतीसाठी पात्र आहेत, असा या पदोन्नतीचा अर्थ होणार नाही व या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे त्यांना नियमित पदोन्नतीचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

vii) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००३१४०४४३२२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400067, st=Maharashtra, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2015.10.03 16:30:42 +05'30'

( तु.पु.हिर्लेकर )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर,
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
७. विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर.
८. अपर आयुक्त, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर
९. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली
१०. सर्व सह सचिव/उप सचिव/विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१२. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय,नागपूर.
१३. उपायुक्त (नियोजन),विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर.
१४. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६ ब), मंत्रालय, मुंबई.
१७. अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, गोंदिया.
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, गडचिरोली/गोंदिया
२०. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, चंद्रपूर.
२१. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
२२. श्री.न.शि.खोब्रागडे, संशोधन सहायक, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, गोंदिया
२३. निवड नस्ती.